**महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेसाठी जिल्हा स्तरावर प्रतिनियुक्तीने पदे भरणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक- आकृवि- १०११ /प्र.क्र. १५८/१५अे**
**मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक - ११ ऑक्टोंबर ,२०११.**

वाचा :- १. शासन निर्णय नियोजन विभाग, क्र.आकृति २०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि.३१.५.२०११

**शासन आदेश :-**

नियोजन विभागाच्या उपरोक्त नमुद शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कार्यान्वयासाठी आयुक्त, जिल्हाधिकारी, जिल्हा परिषद व तालुका स्तरावरील कार्यालयातील सुधारित आकृतिबंध मंजुर झाला आहे. सदर सुधारित आकृतिबंधानुसार विभागीय आयुक्त कार्यालयांसाठी प्रत्येकी १ प्रमाणे अधिक्षक कृषि अधिकारी संवर्गातील एकुण ६ पदे व जिल्हा परिषदेत प्रत्येकी १ प्रमाणे ३३ जिल्हयांसाठी महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब संवर्गातील एकुण ३३ पदे नव्याने निर्माण केली आहेत.

महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब संवर्गातील (वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे ४६०० ) पुढील अधिका-यांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदांवर प्रतिनियुक्ती करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | प्रतिनियुक्तीने पदस्थापना करावयाचा जिल्हा |
|---|---|---|
| १ | श्री.सुभाष बाबुराव आघाव,<br>तालुका कृषि अधिकारी, वडवणी जि.बीड | महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत (MREGS) जिल्हा परिषद, औरंगाबाद |
| २ | श्री.एम.के.आसलकर,<br>तालुका कृषि अधिकारी, भुम | महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत (MREGS) जिल्हा परिषद, उस्मानाबाद |
| ३ | श्री.दिपक रघुनाथ ठाकुर,<br>तालुका कृषि अधिकारी, संग्रामपूर जि.बुलढाणा | महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत (MREGS) जिल्हा परिषद, जळगांव |

२. उपरोक्त अधिका-यांनी सध्याच्या पदाचा कार्यभार नजिकच्या अधिका-यांकडे सोपवुन प्रतिनियुक्तीच्या पदावर तात्काळ रुजु व्हावे.

३. सदर अधिका-यांची प्रतिनियुक्ती सोबतच्या अटी व शर्तीनुसार राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( संदिप ढाकणे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र  राज्य, पुणे-१,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद/जळगांव/उस्मानाबाद
कृषि सहसंचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी बीड/औरंगाबाद/बुलढाणा/जळगांव/उस्मानाबाद
सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी  द्वारा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व संबंधित अधिकारी, द्वारा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
निवड नस्ती/१५अे

**प्रत :-** **१) मा.मंत्री (कृषि ) / मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव**
**२) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्विय सहाय्यक**

**शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. आकृवि-१०११/प्र.क्र.२०५ /१५-अे, दि. ११ ऑक्टोबर,२०११ चे सहपत्र.**

**<u>स्वीयेत्तर सेवेत बदली करण्याच्या संबंधातील अटी व शर्ती</u> :-**

१) **<u>प्रतिनियुक्तीचा कालावधी</u> :- महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेतील जिल्हा परिषद येथील कृषि अधिकारी** वर्ग-२ यांची प्रतिनियुक्ती, ते प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार स्विकारतील तेव्हापासून **तीन** वर्ष राहील. सदर कालावधी समाप्त झाल्यानंतर ते शासनाकडील पदावर पुन्हा रुजू होतील त्या दिनांकापासुन त्यांची प्रतिनियुक्ती समाप्त होईल. हे **तीन** वर्षाच्या कालावधीकरीता प्रतिनियुक्तीवर असतील. मात्र असे की,

१) लोकसेवेच्या दृष्टीने त्यांची सेवा शासनाला आवश्यक झाली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी त्यांना कोणत्याही वेळी परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

२) त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्यास आवश्यक नसेल तर त्यांना त्यांच्या मूळ विभागास परत पाठविण्याची मुभा असेल. मात्र अशा प्रकारे त्यांना परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला तीन महिन्यांची लेखी नोटीस दिली असली पाहिजे आणि

३) तीन महिन्यापेक्षा कमी नसेल एवढया कालावधीची लेखी नोटीस त्यांनी शासनास दिल्यास त्यांना मूळ विभागात परत येण्याची मुभा असेल.

२. **<u>वेतन व प्रतिनियुक्ती भत्ता :-</u>** शासनाच्या प्रचलित धोरणानुसार देय राहील.

३. **<u>महागाई भत्ता</u>** :- राज्य शासनाच्या सेवेमध्ये अनुज्ञेय असल्याप्रमाणे किंवा त्यांनी स्वीयेत्तर सेवेकडील त्यांच्या पदाला निश्चित केलेली वेतनश्रेणी स्वीकारली असेल तर त्या नियुक्ती वरील नियमानुसार महागाई भत्ता मिळण्याचा त्यांना अधिकार असेल.

४. **<u>घरभाडे भत्ता / स्थानिक पूरक भत्ता</u> :-** राज्य शासनाच्या नियमानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असल्याप्रमाणे मिळण्याचा त्यांना हक्क असेल.

५. **<u>रुजू होण्याचा कालावधी वेतन आणि बदलीच्या संबंधातील प्रवास भत्ता</u> :-** स्वीयेत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि स्वीयेत्तर सेवेमधून परत आल्यानंतर या दोन्ही कालावधीत त्यांचे वेतन आणि प्रवासभत्ता स्वीयेत्तर नियोक्त्याकडून राज्य शासनाच्या सेवा नियमांच्या अनुसार देण्यात येईल.

६. **<u>प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ प्रवासाकरिता प्रवासभत्ता</u> :-** स्वीयेत्तर सेवेमध्ये रुजू झाल्यानंतर केलेल्या प्रवासाकरिता राज्य शासनाच्या सेवा नियमांनुसार अथवा स्वीयेत्तर नियोक्त्याच्या नियमाप्रमाणे प्रवासभत्ता आणि दैनंदिन भत्ता मिळण्याचा त्यास हक्क असेल.

७. **<u>रजा</u> :-** अशा प्रकारे बदली होण्यापूर्वी त्यांना लागू असणा-या रजेचे नियम बदली नंतरही लागू राहातील. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील १८ (२) मध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात येईल. स्वीयेत्तर सेवेमधून मुक्त झाल्यावर स्वीयेत्तर सेवेमधून परस्पर रजेवर जाण्यास त्यांना परवानगी देता

येणार नाही. म्हणजेच शासकीय सेवेमध्ये प्रथम रुजू होऊन मूळ विभागातील सक्षम प्राधिका-यांकडून नेहमीच्या पध्दतीने त्यांनी रजा मंजूर करुन घेतली पाहिजे.

८. स्वीयेत्तर सेवेमध्ये असतांना अथवा सेवेच्या कालावधीत घेतलेल्या रजेच्या काळात कोणत्याही पूरक भत्त्यांच्या संबंधातील संपूर्ण खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याकडून करण्यात येईल.

९. **विकलांगता रजेच्या कालावधीतील रजा वेतन** स्वीयेत्तरे सेवेमध्ये असतांना किंवा सेवेच्या परीणामी ते विकलांग झाल्यास त्यासाठी त्यांच्याकरिता मंजूर करण्यात येईल अशा कोणत्याही विकलांगता रजेच्या संबंधातील रजा वेतन अशी विकलांगता स्वीयेत्तर सेवा समाप्त झाल्यानंतर दृष्टीपथास आली तरीही असे रजा वेतन देण्यास स्वीयेत्तर नियोक्ता जबाबदार असेल अशा रजेच्या संबंधातील रजा वेतनाचा खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याकडून वसूल करण्यात येईल.

१०. **रजा वेतन आणि निवृत्ती वेतन अंशदाने** :- अ) वेळोवेळी सुधारण्यात आलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ मधील परिशिष्ट -४ मध्ये विहित केलेल्या दराने स्वीयेत्तर नियोक्त्याकडून रजा वेतन आणि निवृत्ती वेतनाची अंशदाने देण्यात येतील.

**ब**) स्वीयेत्तर नियोक्ता दरवर्षी प्रत्येक वित्तीय वर्षाच्या समाप्तीनंतर १५ दिवसांचे आत अथवा स्वीयेत्तर सेवेतील प्रतिनियुक्ती एखाद्या वित्तीय वर्षाच्या समाप्तीपूर्वी समाप्त होत असेल तर स्वीयेत्तर सेवेच्या अखेरीस रजा आणि निवृत्ती वेतनाची अंशदाने देईल.

अंशदानाच्या रकमा पुढील निरनिराळ्या लेखा शिर्षाखाली जमा करण्यात येतील.

(एक) निवृत्ती वेतन अंशदान '००७१, निवृत्ती वेतन व इतर सेवानिवृत्ती

याच्या वसुली संबंधातील अंशदाने व वसुलीच्या रकमा' ०१- नागरी-

१०१ अभिदान व अंशदाने (क) स्वीयेत्तर सेवेतील अधिकारी,

(दोन) रजा वेतन यांची अंशदान '००७०- इतर प्रशासकीय व सेवा ६०,

इतर सेवा -८००इतर जमा रकमा (नऊ) रजा वेतन अंशदाने

**(क)** स्वीयेत्तर सेवेमध्ये त्यांच्या संबंधात देय असलेले रजा वेतन किंवा निवृत्ती वेतन यांची अंशदाने उपनिर्दिष्ट कालावधीत देण्यात आली नाहीत / शासनाकडे विनिदेशपूर्वक भरणा करण्यात आला नसेल तर उपरोक्त कालावधीच्या समाप्तीपासून अंशदानाच्या रकमा अंतिमरित्या देण्यात येईपर्यन्त प्रत्येकी रु. १००/- दर दिवशी दोन पैसे या दराने स्वीयेत्तर नियोक्ता व्याज देईल. शासकीय कर्मचारी अर्थवा स्वीयेत्तर नियोक्ता यांच्याकडून अंशदान ज्याप्रमाणे देण्यात येते त्याप्रमाणे त्यानुसार त्यांच्याकडून किंवा स्वीयेत्तर नियोक्त्याकडून व्याज देण्यात येईल.

ड) रजा वेतन आणि निवृत्ती वेतन अंशदान यांच्या रकमा निरनिराळया लेखा शिर्षाखाली जमा करावयाच्या असल्याने व या रकमांची शासनाच्या कोणत्याही स्वरुपाच्या वसुली योग्य रकमामधून वजावट करण्यात येत नसल्याने त्या स्वतंत्रपणे भरण्यांत येतील.

११. **रजा मुदतीत प्रवास सवलत :-** राज्य शासनाच्या संबंधित नियमानुसार शासकीय कर्मचा-यांना अनुज्ञेय असलेली रजा मुदती प्रवास सवलत मिळण्याचा त्यांना हक्क असेल. या संबंधातील सर्व खर्च स्वीयेत्तर नियोक्ता करील.

१२. **वैद्यकीय सवलत :-** महाराष्ट्र नागरी सेवा (वैद्यकीय उपचार ) नियम १९६१ अन्वये अनुज्ञेय असलेल्या वैद्यकीय सवलतीपेक्षा कनिष्ठ प्रकारच्या नसतील अशा वैद्यकीय सवलती मिळण्याचा त्यांना हक्क असेल त्या संबंधातील सर्व खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याकडून करण्यात येईल.

१३. **सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी/ अभिदान (सबस्क्रीप्शन) :-** ज्या भविष्य निर्वाह निधीमध्ये ते अभिदान करीत असतील त्या भविष्य निर्वाह निधीमध्ये ते विहित नियमानुसार अभिदान करण्याचे चालू ठेवतील.

१४. **विभागीय चौकशी** :- प्रतिनियुक्तीवर असतांना त्यांचे विरुध्द विभागीय चौकशी करावयाची असेल तर त्यांना मूळ विभागाकडे पाठविण्यात येईल. तथापि यासाठी संबंधित अधिका-यांना शासन देईल तो निर्वाह भत्ता मंडळाकडून वसूल करण्यात येईल.

१५. **प्रपत्र पदोन्नती :-** प्रतिनियुक्तीवर असताना त्याच्या मुळ विभागात / ते पदोन्नतीस पात्र झाले तर सर्वसाधारणपणे त्यांना प्रतिनियुक्तीवर ठेवण्यात येणार नाही. तथापि, सक्षम प्राधिका-यांनी त्यांची प्रतिनियुक्ती चालू ठेवली तर कोणताही प्रतिनियुक्ती भत्ता न देता निकट निम्नता नियमानुसार (नेक्स्ट बिलो रुल ) त्यांना पदोन्नतीचे वेतन मंजूर करण्यात येईल आणि निकट निम्नता नियमाचा लाभ सहा महिन्यानंतर अनुज्ञेय असणार नाही.

१६. **कायमचे सामवून घेणे :-** कालांतराने त्यांची सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमामध्ये सामावून घेतले जाण्याची इच्छा असेल तर सदर उपक्रमात सामावल्या गेलेल्या दिवसापासून ते शासनाच्या सेवेतून सेवानिवृत्त झाले, असे मानले जाईल.

१७. **राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना :-** राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या अधीन त्यांच्याकडून आवश्यक ती वर्गणी वसूल करुन पुढील लेखाशिर्षाखाली जमा केली जाते. याबद्दल स्वीयेत्तर नियोक्त्याने खात्री करुन घ्यावी.

'८०११, विमा व निवृत्ती वेतन निधी - १०६ इतर विमा व वेतन निधी -१ महाराष्ट्र राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना'

राज्य शासनाकडून वेळोवेळी निर्गमित होणा-या नियमाच्या अधीन त्यांची प्रतिनियुक्ती राहील.

---xx---